संत ज्ञानेश्वर उद्यानाच्या जीर्णोध्दार तसेच अद्यावतीकरणाच्या कामांस मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
शासन निर्णय क्रमांक :टिडीएस २०२४/०२/प्र.क्र.५३/पर्यटन,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : १० जुलै, २०२४.

**संदर्भ :** उप अधीक्षक अभियंता, गोदावरी मराठवाडा पाटंबधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र.जा.क्र.गोदावरी/ सिंचन-२/धा-५२(२०२३)/१०९२०, दि.१४/१२/२०२३.

**प्रस्तावना :-**

संत ज्ञानेश्वर उद्यान, पैठण विकसित करणेबाबत मा. मुख्यमंत्री महादेयांच्या अध्यक्षतेखाली दि.२५/०८/२०२१ रोजी बैठक घेण्यात आली. सदरील बैठकीत मा. मुख्यमंत्री यांनी सदरील उद्यान विकसित करुन कार्यान्वीत करण्याच्या सुचना दिल्या होत्या.

**शासन निर्णय:-**

मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.०५/०३/२०२४ रोजी शिखर समितीच्या झालेल्या बैठकीत संत ज्ञानेश्वर उद्यान पैठण विकसित करण्याकरीता रु.१४९.०० कोटी इतक्या किमंतीच्या कामास प्रशासकीय मान्यता देऊन टप्या-टप्याने निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सुधारित DPR चा घोषवारा खालीप्रमाणे आहे :-

| Sr. No. | Item | Amount (in Cr.) | |
|---|---|---|---|
| | | Original | Revised |
| 1. | Entrance Internal Road (Civil, Landscape & Electrical) | 3.96 | 2.90 |
| 2. | Main Entrance Gate (Civil & Electrical) | 2.00 | 2.05 |
| 3. | Oval Road (Civil, Landscape & Electrical) | 9.60 | 8.25 |
| 4. | Restoration of Central park (Civil, Landscape & Electrical) | 25.78 | 20.05 |
| 5. | Development of Pathway in Central Court yard garden part 1 & 2 (Civil) | 22.69 | 19.20 |
| 6. | Fountain Seating Area (Civil & Electrical) | 1.14 | 1.24 |
| 7. | Toy Train with Stations (Civil) | 2.85 | 2.85 |
| 8. | Parking Area (Civil, Landscape & Electrical) | 10.97 | 3.60 |
| 9. | Compound wall (Civil) | 5.23 | 7.40 |
| 10. | Food court area (Civil, Landscape & Electrical) | 11.15 | 4.90 |
| 11. | Vithal statue (lekurwala concept theme) (Civil, Landscape & Electrical) | 1.76 | 1.76 |
| 12. | PaitahniHaat including Tiolet block, & Museum (Civil & Electrical) | 11.36 | 5.10 |
| 13. | Admin Building (Civil & Electrical) | 2.64 | 2.28 |
| 14. | Water Park Development | 5.23 | 5.23 |
| 15. | Dnyandpeeth Courtyard Development &Restoration of Museum Building (Civil, Landscape & Electrical) | 3.60 | 1.00 |
| 16. | Toilet Block (Civil & Electrical) 4nos. | 2.85 | 2.85 |
| 17. | South & West side Entrance Gate including Civil & Electrical | 1.52 | 0.26 |
| 18. | Miscellaneous works like sculptures along Oval road, Dust Been, Benches, Signage etc. | 1.86 | 2.00 |

| | | | |
|---|---|---|---|
| 19. | Development of Bridge (Civil) | 1.25 | 0.00 |
| 20. | Drinking water Facility (Civil) | 0.26 | 0.26 |
| 21. | River View development including Gazebo & Pathways (Civil, Landscape & Electrical) | 2.25 | 2.25 |
| 22. | Boating Area development (Jetty Development) | 1.76 | 1.76 |
| 23. | Nalla Strengthening & Channelization (Civil & Electrical ) | 1.47 | 1.00 |
| 24. | Watch Tower- 2 nos. (Civil) | 0.51 | 0.51 |
| 25. | GIS Substation (Electrical) | 0.26 | 0.26 |
| 26. | HT Line, Cable Trench & Tray Work (Electrical) | 0.27 | 0.27 |
| 27. | LT line distribution work & Transformer Civil Work (Electrical) | 0.19 | 0.19 |
| 28. | Development of Fountain miscellaneous works (Electrical) | 2.27 | 2.27 |
| | **Theme Garden** | | |
| 1. | Cultural Theme park (Civil, Electrical & Landscape) | 1.06 | 1.06 |
| 2. | Historical Theme park (Civil, Electrical & Landscape) | 1.38 | 1.50 |
| 3. | TulsiVatica (Civil, Electrical & Landscape) | 1.18 | 1.18 |
| 4. | Aquascaping Lotus Garden (Civil, Electrical & Landscape) | 2.05 | 2.05 |
| 5. | Botanical Park Fruit Garden (Civil, Electrical & Landscape) | 1.00 | 1.00 |
| 6. | Botanical Forest Garden (Civil, Electrical & Landscape) | 2.66 | 2.00 |
| 7. | Butterfly Garden (Civil, Electrical & Landscape) | 2.99 | 2.00 |
| 8. | Sensory Garden (Civil, Electrical & Landscape) | 3.54 | 2.00 |
| 9. | Kids play area Development (Without Playing Equipment) | 0.73 | 0.73 |
| 10. | Construction of Sky-walk at Chidiyaghar | 1.61 | 0.00 |
| 11. | ChidiyaGhar development (Civil, Electrical & Landscape) | 2.73 | 0.00 |
| 12. | Jambhulvan Development (Civil, Electrical & Landscape) | 2.96 | 2.96 |
| 13. | Motion Chair (Electrical) | 1.00 | 1.00 |
| 14. | Optical Illumination (Electrical) | 1.16 | 1.16 |
| | **Total** | **162.16** | **120.33** |
| | **Add Consultancy charges @ 3.5%** | 5.68 | 4.21 |
| | **Add. 1% for insurance Rs.** | 1.62 | 1.20 |
| | **Add. 18% GST charges Rs.** | 29.19 | 21.66 |
| | **Add for Royalty Charges** | 3.75 | 1.60 |
| | **Grand Total** | 202.40 | 149.00 |
| | **Say Rs.** | 202.40 | 149.00 |

०२. अटी व शर्ती :-

१) सदर प्रकल्पाची प्रचालन करताना खालील अटी व शर्तीची अंमलबजावणी करण्यात यावी. वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

२) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संबंधित जिल्हाधिकारी यांची राहील व जादा खर्चाप्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) पर्यटन विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून केलेल्या कामाच्या ठिकाणी सदर कामेपर्यटन विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून केली असल्याबाबतचे फलक लावण्यात यावेत.

४) ज्या कामाबाबत निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

५) प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल, याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी- १०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दि.१०/९/२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी. तसेच प्रकल्पाची अंमलबजावणी करताना आवश्यक त्या तांत्रिक बाबीशी संबंधित मान्यता विहित स्तरावर घेण्यात याव्यात.

६) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

७) सदर निधीतून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळामार्फत न चुकता शासनास सादर करावीत.

८) गुणनियंत्रण यंत्रणेद्वारे कामाची प्रत्यक्ष गुणवत्ता तपासणी केल्याचा प्रमाणित अहवाल तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा सचित्र दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता महामंडळामार्फत शासनास सादर करण्यात यावे. तद्नंतर पुढील उर्वरित निधी वितरित केला जाईल.

९) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणा व संबंधित संस्था यांची राहील.

३. वरील प्रयोजनार्थ करावयाच्या टप्पे निहाय्य निधी ही त्या-त्या वित्तीय वर्षातील मंजुर तरतूदीतुन मुख्यलेखाशीर्ष "मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षाखालील टप्या-टप्याने निधी वितरितकरण्यासमान्यतादेण्यातयेतआहे.

४. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाचीरक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता जिल्हास्तरावरील कामांसाठी संबंधित सहायक जिल्हा नियोजन अधिकारी/ जिल्हा नियोजन अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी व संबंधित जिल्हाधिकारी यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई / संबंधित जिल्हा कोषागार कार्यालयात देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करण्यात यावी, सदर कार्यवाहीबाबतचा सचित्र अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

६. सदरचा शासन निर्णय हावित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३. दि.१२.०४.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत निर्गमित करण्यात येत असून वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३ परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची व अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

७. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१०१४५०१८७६२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SANTOSH VITHAL ROKADE

Digitally signed by SANTOSH VITHAL ROKADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ca5751ffedbb005fdff34ab6ac1f8319d061483d7d35e20f744e251360f7920a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=ECF4A9ABE84C70DE989C3669424C12B6CADCB583D500FE489CE8727916E0BBEE, cn=SANTOSH VITHAL ROKADE
Date: 2024.07.10 15:27:23 +05'30'

**( संतोष जया विठ्ठल रोकडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उप मुख्यमंत्रीतथा गृह मंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (पर्यटन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. विरोधी पक्षनेता विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा, विधानभवन, मुंबई.
८. मा. सर्व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
९. मा. सर्व विधानसभा सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
१०. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय मुंबई.
१३. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
१५. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
१६. जिल्हाधिकारी, छत्रपती संभाजीनगर.
१७. निवडनस्ती(पर्यटन.)